अमरावती प्रकल्प बांधकाम विभाग, अमरावती व यवतमाळ मध्यम प्रकल्प विभाग, यवतमाळ हे दोन विभाग त्यांच्या अंतर्गत असलेल्या उपविभागांसह पाटबंधारे प्रकल्प व जलसंपत्ती अन्वेषण मंडळ, अमरावती ह्या मंडळास संलग्न करणेबाबत...

महाराष्ट्र शासन
शासन निर्णय क्र.आढावा-२०१०/(प्र.क्र.४७४/२०१०)/आ (प्रशि)
जलसंपदा विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांकः- २४ मार्च, २०११

वाचाः- १) शासन निर्णय क्र.आढावा-२००८/(९९/२००८)/भाग-२/आ (प्रशि), दि.२९/५/२००८
२) शासन निर्णय क्र.आढावा-२००८/(९९/२००८)/भाग-२/आ (प्रशि), दि.१३/६/२००८
३) शासन निर्णय क्र.आढावा-२००८/(९९/२००८)/भाग-२/आ (प्रशि), दि.१/८/२००८
४) का.सं.वि.पा.वि.म.नागपूर यांचे पत्र क्र.७३६७/विपाविम/काआ-१/आढावा/२०१०, दि.२५/११/२०१०.
५) मुख्य अभियंता (विशेष प्रकल्प), अमरावती यांचे पत्र क्र.जसंवि(विप्र)/आस्था-४/आढावा/(१५७/२०१०)/५५५८/२०१०, दि.३१/१२/२०१०.

**प्रस्तावनाः-**

विदर्भ प्रादेशिक विभागांतर्गत अमरावती विभागातील सिंचनाचा अनुशेष दूर करण्यासाठी अमरावती विभागात नव्याने हाती घ्यावयाच्या प्रकल्पांचे सर्वेक्षण, अन्वेषण, प्रकल्प अहवाल तयार करणे, प्रशासकीय मान्यता, भूसंपादन व वन जमिनीच्या प्रस्तावांना मंजूरी आणि प्रत्यक्षात अंमलबजावणी करण्यासाठी मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प, अमरावती यांचे एक नवीन कार्यालय आणि पाटबंधारे प्रकल्प व जलसंपत्ती अन्वेषण मंडळ, अमरावती यांचे एक मंडळ कार्यालय आणि वाशिम व बुलढाणा येथे काही विभाग/उपविभाग वर्गीकरणाने स्वतंत्र आस्थापना संदर्भाधिन दि.२९ मे, २००८ च्या शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आली आहे.

पाटबंधारे प्रकल्प व जलसंपत्ती अन्वेषण मंडळ, अमरावती या कार्यालयाची निर्मिती अमरावती विभागातील सर्वेक्षण व अन्वेषण आणि बांधकाम विषयक कामे करण्याकरिता झालेली आहे. अमरावती प्रदेशातील सिंचनाचा अनुशेष कालबध्द पध्दतीने निर्मूलनासाठी तीनही मंडळाकडील उपलब्ध आस्थापनेचा पूरेपूर वापर तसेच सर्व मंडळातील कार्यभाराचा समतोल राखण्याचे दृष्टीने पाटबंधारे प्रकल्प व जलसंपत्ती अन्वेषण मंडळ, अमरावतीकडे काही बांधकामाधीन प्रकल्प सोपविण्याची आवश्यकता भासल्याने अमरावती प्रकल्प बांधकाम विभाग, अमरावती व यवतमाळ मध्यम प्रकल्प विभाग, यवतमाळ हे दोन विभाग, त्या अंतर्गत असलेल्या सर्व उपविभागांसह पाटबंधारे प्रकल्प व जलसंपत्ती अन्वेषण मंडळ, अमरावती ह्या मंडळास संलग्न करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

मुख्य अभियंता (विशेष प्रकल्प), जलसंपदा विभाग, अमरावती यांच्या नियंत्रणाखालील अकोला पाटबंधारे मंडळ, अकोला अंतर्गत कार्यरत १) अमरावती प्रकल्प बांधकाम विभाग, अमरावती आणि २) यवतमाळ मध्यम प्रकल्प विभाग, यवतमाळ हे दोन विभाग त्या अंतर्गत असलेल्या सर्व उपविभागांसह पाटबंधारे प्रकल्प व जलसंपत्ती अन्वेषण मंडळ, अमरावती ह्या कार्यालयास अमरावती विभागातील सिंचन अनुशेष निर्मूलनाची कामे कालबध्द कार्यक्रमानुसार व योग्य गुणवत्तेची होण्याच्या दृष्टीने त्या विभागातील सर्वेक्षण, अन्वेषण आणि बांधकामविषयक कामे करण्यासाठी संलग्न करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

उपरोक्त वर्गीकरणामुळे अकोला पाटबंधारे मंडळ, अकोला या मंडळांतर्गत एकूण ४ विभाग व २४ उपविभाग + १ संकल्पचित्र उपविभाग तसेच पाटबंधारे प्रकल्प व जलसंपत्ती अन्वेषण मंडळ, अमरावती या मंडळाकडे एकूण ५ विभाग व २७ उपविभाग कार्यरत राहतील. मुख्य अभियंता (विशेष प्रकल्प), जलसंपदा विभाग, अमरावती यांच्या नियंत्रणाखालील मंडळ कार्यालयांतर्गत विभाग/उपविभागांची रचना सोबतच्या प्रपत्र-अ प्रमाणे राहील.

अकोला पाटबंधारे मंडळ, अकोला अंतर्गत अमरावती प्रकल्प बांधकाम विभाग, अमरावती आणि यवतमाळ मध्यम प्रकल्प विभाग, यवतमाळ या विभागांतर्गतची संपूर्ण आस्थापना मंजूर पदांसह पाटबंधारे प्रकल्प व जलसंपत्ती अन्वेषण मंडळ, अमरावती या मंडळाकडे वर्ग करण्यात यावी. वर्गीकरण झालेली सर्व कार्यालये शासकीय जागेतच ठेवावीत, त्यासाठी बांधकामाचा वेगळयाने खर्च करु नये. तसेच सध्याच्या कार्यरत उपविभागांतील उपलब्ध साहित्याचाच वापर करण्यात यावा.

उपरोक्त नमूद केलेली कार्यालये विदर्भ प्रादेशिक विभागांतर्गत अमरावती विभागामध्ये दिनांक १ मे, २०११ पासून कार्यान्वित होतील या दृष्टीने कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांनी आवश्यक ती सर्व कार्यवाही करुन उपरोक्त कार्यालये दिनांक १ मे, २०११ पासून कार्यान्वित करावीत.

शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दिनांक ८ मार्च, १९८४ मधील तरतूदींनुसार संबंधित मुख्य अभियंता, मंडळ, विभाग कार्यालयाच्या मुख्य अभियंता, अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

या प्रकरणी होणारा खर्च मुख्य लेखाशिर्ष "४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च (०४) योजनेतर- वेतनावरील खर्चासाठी भाग भांडवली अंशदान (०४) (०२) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७०१ आय १७१)" या लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा व मंजूर अनुदानातून भागवावा.

शासन निर्णय क्र.वित्त विभाग क्र.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५.१०.१९९२ मधील तरतूदीनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार व आंतर वित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. **२०११०३२४१५१३४८००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

सहपत्रः-प्रपत्र-अ

**( नंदकिशोर गरुड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव
मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (कृ.खो.) यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (खारजमीन) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक
मा.राज्यमंत्री (लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक
सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
महालेखापाल १/२ महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
महालेखापाल १/२ महाराष्ट्र राज्य (लेखापरिक्षा) मुंबई/नागपूर
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व कार्यकारी संचालक, महामंडळे/सर्व महासंचालक.
सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग,
सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व अधिकारी व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
संगणक कार्यक्रम कक्ष, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई (कार्यालयांच्या स्थलांतरणाबाबत आवश्यक ती नोंद घेण्यास्तव)
कार्यासन आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ
निवडनस्ती धारिका.

**प्रपत्र-अ**

**मुख्य अभियंता (विशेष प्रकल्प), जलसंपदा विभाग, अमरावती अंतर्गत**

**मंडळ कार्यालये व त्याअंतर्गत विभाग / उपविभागीय कार्यालये यांचा तपशील**

**अकोला पाटबंधारे मंडळ अकोला**

| क्र. | विभाग व उपविभाग |
|---|---|
| **१)** | **अमरावती पाटबंधारे विभाग अमरावती** |
| १ | पाटबंधारे उपविभाग अमरावती |
| २ | लघु पाटबंधारे बांधकाम उपविभाग धारणी |
| ३ | नवीन लघु पाटबंधारे उपविभाग अचलपूर |
| ४ | लघु पाटबंधारे अन्वेषण उपविभाग अमरावती |
| ५ | लघू पाटबंधारे बांधकाम उपविभाग अचलपूर |
| ६ | लघु पाटबंधारे सर्व्हे. उपविभाग अमरावती |
| **२)** | **यवतमाळ पाटबंधारे विभाग यवतमाळ** |
| १ | सिंचन उपविभाग क्र. १ यवतमाळ |
| २ | सिंचन उपविभाग क्र.२ यवतमाळ |
| ३ | सिंचन उपविभाग पुसद |
| ४ | सिंचन उपविभाग पांढरकवडा |
| ५ | सिंचन उपविभाग महागांव |
| **३)** | **अकोला पाटबंधारे विभाग अकोला** |
| १ | पाटबंधारे सिंचन उपविभाग अकोला |
| २ | पाटबंधारे उपविभाग बोरगांवमंजू |
| ३ | अडोळ कालवे उपविभाग.अकोला |
| ४ | मृद तपासणी उपविभाग अकोला |
| ५ | ल.पा. बां. उ.वि. क्र.२ पातुर (मु.अकोला) |
| ६ | लघू पाटबंधारे सर्वेक्षण उपविभाग अकोट |
| **४)** | **बुलढाणा पाटबंधारे विभाग बुलढाणा** |
| १ | पाटबंधारे उपविभाग मेहकर |
| २ | पाटबंधारे उपविभाग मलकापूर |
| ३ | पाटबंधारे उपविभाग खामगांव |
| ४ | पाटबंधारे उपविभाग चिखली |
| ५ | लघु पाटबंधारे बांधकाम उपविभाग मेहकर |
| ६ | लघु पाटबंधारे सर्व्हे उपविभाग बुलढाणा |
| ७ | व्याघ्रानाला कालवे उपविभाग मलकापूर |

**पाट. प्रकल्प व जलसंपत्ती अन्वेषण मंडळ , अमरावती**

| क्र. | विभाग व उपविभाग |
|---|---|
| **१)** | **पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण विभाग अमरावती** |
| १ | पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण उपविभाग क्र.१ अमरावती |
| २ | पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण उपविभाग क्र. २ अमरावती |
| ३ | पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण उपविभाग पुसद मु.अमरावती |
| ४ | पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण उपविभाग ,यवतमाळ |
| ५ | पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण उपविभाग .अचलपूर |
| ६ | पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण उपविभाग धारणी |
| **२)** | **पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण विभाग अकोला** |
| १ | पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण उपविभाग अकोला |
| २ | पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण उपविभाग मुर्तिजापूर |
| ३ | पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण उपविभाग खामगांव |
| ४ | पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण उपविभाग वाशिम मु.अकोला |
| **३)** | **पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण विभाग वाशिम** |
| १ | पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण उपविभाग क्र .१ मालेगांव |
| २ | पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण उपविभाग क्र.२ मानोरा |
| ३ | पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण उपविभाग क्र.३ वाशिम |
| ४ | पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण उपविभाग क्र .४ मंगरुळपीर |
| **४)** | **अमरावती प्रकल्प बांधकाम विभाग अमरावती** |
| १ | निम्न पेढी धरण उपविभाग अमरावती |
| २ | निम्न पेढी धरण उपविभाग क्र. १ अमरावती |
| ३ | पंढरी मध्यम प्रकलप उपविभाग क्र. १ वरुड |
| ४ | पंढरी मध्यम प्रकल्प उपविभाग क्र. २ वरुड |
| ५ | बोर्डी नाला प्रकल्प उपविभाग क्र.१ मोर्शी |
| ६ | बोर्डी नाला प्रकल्प उ.वि. क्र.१ चांदूरबाजार |
| **५)** | **यवतमाळ मध्यम प्रकल्प विभाग यवतमाळ** |
| १ | लघु पाट. सर्व्हे. उपविभाग स्था.क्षे.क्र.१ यवतमाळ |
| २ | वाईचंडिकामाता प्रकल्प उपविभाग पांढरकवडा |
| ३ | लघु पाटबंधारे सर्व्हेक्षण उपविभाग पुसद |
| ४ | लघु पाटबंधारे उपविभाग यवतमाळ |
| ५ | लघु पाटबंधारे सर्व्हेक्षण उपविभाग यवतमाळ |
| ६ | भुविकास बांधकाम उपविभाग यवतमाळ |
| ७ | दारव्हा मध्यम प्रकल्प उपविभाग दारव्हा |

**वाशिम पाटबंधारे मंडळ , वाशिम**

| क्र. | विभाग व उपविभाग |
|---|---|
| **१)** | **लघु पाटबंधारे विभाग, वाशिम** |
| १ | लघु पाटबंधारे बांधकाम उपविभाग वाशिम |
| २ | लघु पाटबंधारे सर्वेक्षण उपविभाग वाशिम |
| ३ | लघु पाटबंधारे बांधकाम उपविभाग, मंगरुळपीर |
| ४ | लघु पाटबंधारे बांधकम उपविभाग मालेगांव |
| ५ | लघु पाटबंधारे बांधकाम उपविभाग रिसोड |
| ६ | लघु पाटबंधारे सिंचन उपविभाग, वाशिम |
| ७ | लघु सिंचन उपविभाग, कारंजा |
| ८ | लघू पाटबंधारे (स्था.स्त.)सर्वे उपविभाग मंगरुळपीर |
| **२)** | **लघु पाट. विभाग क्र. २, वाशीम. (मु. कारंजा)** |
| १ | लघु पाटबंधारे बांधकाम उपविभाग क्र .१ वाशिम |
| २ | लघु पाटबंधारे बांधकाम उपविभाग क्र.२ वाशिम |
| ३ | लघु पाटबंधारे बांधकाम उपविभाग क्र. १ रिसोड |
| ४ | लघु पाटबंधारे बांधकाम उपविभाग क्र.२ रिसोड |
| **३)** | **लघु पाटबंधारे विभाग क्र. ३, वाशिम** |
| १ | लघु पाटबंधारे बांधकाम उ.वि. क्र.३, वाशिम |
| २ | लघु पाटबंधारे बांधकाम उपविभाग, कारंजा |
| ३ | लघु पाटबंधारेबांधकाम उ.वि. क्र.१, कारंजा |
| ४ | लघु पाटबंधारे बांधकाम उ.वि. क्र. २, कारंजा |

**( नंदकिशोर गरुड )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**